**सी.बी.आय. विशेष न्यायालयांमध्ये PMLA अधिनियमांतर्गतची प्रकरणे चालविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विशेन्या १३२३/प्र.क्र.६६/का-९**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ०३ ऑगस्ट, २०२३.

**संदर्भ :** (१) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. सीआरसी १०९८/७५०/(६०)नऊ, दि.२२.१०.२००७.
(२) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. सीआरसी १००९/ प्र.क्र.८०/ नऊ, दि.१६.११.२०१०.
(३) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. विशेन्या १३१३/ प्र.क्र.६४/ नऊ, दि.०२.०५.२०१३.
(४) विशेष संचालक, सक्तवसुली संचालनालय, दिल्ली यांचे पत्र क्र. T-१०/२२/Legal Division/२०२२, दि.०४.०५.२०२३.
(५) उप सचिव, विधी विभाग, केंद्र शासन यांचे पत्र क्र.F.No. १५०११/९०/२०२३-Jus (AU)/(८३०८), दि.१६.०६.२०२३.
(६) मा. उच्च न्यायालयाचे पत्र क्र. Legal/Misc./५३४/२०२३, दि.२६.०६.२०२३.
(७) अवर सचिव, कार्मिक व प्रशिक्षण विभाग, केंद्र शासन यांचे पत्र क्र. २६८/४०/२०२३-AVD-II, दि.२८.०७.२०२३.

**प्रस्तावना :-**

केंद्रीय गुन्हे अन्वेषण (सी.बी.आय.) यांनी दाखल केलेली प्रकरणे चालविण्यासाठी संदर्भ क्र. १ ते ३ येथील शासन निर्णयांन्वये राज्यात १२ विशेष न्यायालये स्थापन करण्यात आली आहेत. Prevention of Money Laundering Act, २००२ (PMLA) अधिनियमांतर्गत दाखल प्रकरणांची गती वाढविण्यासाठी PMLA अधिनियमांतर्गत प्रलंबित खटल्यांचे वाटप मुंबई येथील सर्व सी.बी.आय. विशेष न्यायालयांमध्ये करण्याबाबतची विनंती विशेष संचालक, सक्तवसुली संचालनालय, दिल्ली यांनी संदर्भ क्र. ४ येथील दि.०४.०५.२०२३ रोजीच्या पत्रान्वये केली आहे.

संदर्भ क्र. १ ते ३ येथील शासन निर्णयांमध्ये सी.बी.आय. विशेष न्यायालयांमध्ये केवळ केंद्रीय गुन्हे अन्वेषण (सी.बी.आय.) यांनी दाखल केलेली प्रकरणे चालविण्यात यावी असे नमूद करण्यात आले आहे. त्यामुळे,

सदर सी.बी.आय. विशेष न्यायालयांमध्ये Prevention of Money Laundering Act, २००२ (PMLA) अधिनियमांतर्गतची प्रकरणे चालविण्याबाबतच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, सदर शासन निर्णयांबाबत स्पष्टीकरण उपलब्ध करून देण्याची विनंती मा. उच्च न्यायालयाने संदर्भ क्र. ६ येथील दि.२६.०६.२०२३ रोजीच्या पत्रान्वये शासनास केली आहे.

मा. उच्च न्यायालयाच्या विनंतीच्या अनुषंगाने अभिप्राय देण्याची विनंती कार्मिक व प्रशिक्षण विभाग, केंद्र शासन यांना संदर्भ क्र. ६ येथील दि.२६.०७.२०२३ रोजीच्या शासन पत्रान्वये करण्यात आली होती. यानुषंगाने अवर सचिव, कार्मिक व प्रशिक्षण विभाग, केंद्र शासन यांचे संदर्भ क्र. ७ येथील दि.२८.०७.२०२३ रोजीचे पत्र प्राप्त झाले असून, सी.बी.आय. विशेष न्यायालयांमध्ये PMLA अधिनियमांतर्गतची प्रकरणे चालविण्याबाबतच्या प्रस्तावास त्यांनी सहमती दर्शवली आहे. त्यानुसार सदर प्रकरणी पुढीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील सी.बी.आय. विशेष न्यायालयांमध्ये केवळ केंद्रीय गुन्हे अन्वेषण (सी.बी.आय.) यांनी दाखल केलेली प्रकरणे चालविण्यात यावी, ही संदर्भ क्र. १ ते ३ येथील शासन निर्णयांमध्ये नमूद करण्यात आलेली अट Prevention of Money Laundering Act, २००२ (PMLA) या अधिनियमांतर्गतच्या प्रकरणांपुरती शिथील करण्यात येत आहे. (So as to augment the pace in the PMLA Court proceedings).

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.go.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८०३१८४११८७८१२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDKISHOR LALLU MORE

Digitally signed by NANDKISHOR LALLU MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=8e6e6ef027afaf311b73f55b93d66802f7572a95024328e2d647f7ef65a9432a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69426D4C260E75A2AE012E47A93A468B42FD9B82A0B40FBCADEA1F0C509379CC, cn=NANDKISHOR LALLU MORE
Date: 2023.08.03 18:45:28 +05'30'

**( नंदकिशोर ल. मोरे )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव,**

**प्रति :-**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,

३) मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
४) पोलीस महासंचालक, मुंबई,
५) पोलीस महानिरिक्षक, केंद्रीय गुन्हे अन्वेषण (सी.बी.आय.), मुंबई,
६) प्रमुख न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई,
७) प्रमुख न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय, नागपूर/ पुणे/अमरावती,
८) पोलिस अधिक्षक, केंद्रीय गुन्हे अन्वेषण शाखा (सी.बी.आय.), ११ ए, तन्ना हाऊस, नाथालाल पारेख मार्ग, कुलाबा, मुंबई ४०००५९.
९) महालेखापाल- एक (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
१०) महालेखापाल-दोन (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१२) निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
१३) निवड नस्ती- कार्या.९